2011031621334600I

**सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात**
**महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियान**
**या योजनेअंतर्गत निधी**
**वितरित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र. नगरो-२०१०/प्रक्र-२४२/नवि-३३

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**

**दिनांक : २३ फेब्रुवारी, २०११**

**संदर्भ:** शासन निर्णय क्र. एनयुआर-२००८/प्र.क्र.२०३/नवि-३३, दिनांक २० फेब्रुवारी, २०१०

**प्रस्तावना :** राज्यातील नागरी भागांच्या दिर्घकालीन विचार करुन सुनियोजित विकास करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियान राबविण्याचा निर्णय शासनाने दिनांक २०/०२/२०१० रोजी घेतला असून या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पांना नागरी स्वराज्य संस्थांना पायाभूत सोईसुविधांच्या प्रकल्पाकरीता अनुदान व कर्ज उपलब्ध करुन देण्यात येणार आहे.

त्या अनुषंगाने शासनास प्राप्त झालेल्या प्रकल्प प्रस्तावांची छाननी करुन पात्र प्रकल्पांना निधी वितरित करण्याचा प्रस्ताव राज्य शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावांच्या संदर्भात शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाअभियान अंतर्गत खालील तक्त्यात दर्शविलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रकल्पांना मंजूरी देवून त्याकरीता पुढीलप्रमाणे निधी वितरण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

( रुपये कोटीत )

| अ.क्र. | शहर | प्रकल्प | किंमत | शासनाचा हिस्सा | वितरित करावयाची रक्कम(२५% प्रमाणे) |
|---|---|---|---|---|---|
| १ | कोल्हापूर | रस्ते विकास | १०८.११ | ५४.०५५ | १३.५१३७ |
| २ | कोल्हापूर | मलनिःस्सारण | २६.६१२४ | १३.३०६२ | ३.३२६५ |
| ३ | सोलापूर | मलनिःस्सारण | १६०.०० | ८०.०० | २०.०० |
| ४ | नांदेड | रस्ते विकास | ८८.२३ | ४४.११५ | ११.०२८ |
| ५ | नांदेड | तरोडा पाणीपुरवठा | ११.५६ | ५.७८ | १.४४५ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६ | कामठी | रस्ते विकास व वाहतूक नियंत्रण | ३१.१२३८ | २४.८९९० | ६.२२४७ |
| ७ | कल्याण डोंबिवली | रस्ते विकास | १०२.०१ | ५१.००५ | १२.७५१२ |
| | भिवंडी | मलनि:स्सारण | २५८.९६ | १२९.४८ | ३२.३७ |
| | मनमाड | पाणीपुरवठा | ३७.६७ | १८.८३५ | ४.७०८७ |
| एकूण | | | ८२४.२८ | ४२१.४७५२ | १०५.३६७८ |

०२. सदर रकमांचे वितरण अनुदान म्हणून करण्यात येत आहे. त्यानुसार खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार निधी वितरीत करण्यासाठी मंजुरी देण्यात येत आहे आणि यासाठी श्री. का.तु. सातकर, उपसचिव, नगर विकास विभाग यांना **"नियंत्रण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे व श्री.आ.रा. राजपूत, कक्ष अधिकारी, नगरविकास विभाग यांना **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी **रुपये एकशे पाच कोटी छत्तीस लाख अठ्याहत्तर हजार फक्त** (१०५,३६,७८,०००/-) इतक्या रकमेचा धनादेश "आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई ( Commissioner & Director of Municipal Administration, Mumbai ) या नावे काढावा आणि त्यांनी सदर रकमेचे वितरण संबंधित महानगरपालिकांना/नगरपालिकाना त्यांच्याकडून सदर महाअभियानांतर्गत विहित करारनामा करुन घेऊन तात्काळ करावे. **सदर रकमांचे वितरण पहिल्या हप्त्यापोटी करण्यात येत आहे.**

उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याच्या दृष्टीने खालील अटींचे पालन करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहिल.

१) सदर प्रकल्पांकरीता बँकेत स्वतंत्र खाते उघडावे व या प्रकल्पांकरीता शासनाकडून प्राप्त होणारा निधी तसेच स्थानिक स्वराज्य संस्थेच्या हिश्श्याची स्वत:च्या उत्पन्नातुन रक्कम/हिश्शापोटी घेतलेल्या कर्जाची रक्कम देखील याच खात्यात जमा करावी.

२) सदर निधीचा वापर वर नमूद केलेल्या प्रकल्पांकरीताच करणे आवश्यक असेल. इतर बाबींवर खर्च ही आर्थिक अनियमितता मानली जाईल.

३) सदर प्रकल्पांकरीता निविदा मंजूर करताना मंजूर किंमतीपेक्षा अधिक्य आल्यास त्याचे दायित्व संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेचे राहिल.

०३. करारनाम्यात नमूद केलेल्या सुधारणांबाबत वर्षनिहाय केलेली प्रगती पाहून तसेच वितरित केलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र दिल्यानंतरच सदर योजनेअंतर्गत राज्य शासनाचा पुढील हिस्सा वितरित करण्यात येईल.

०४. सदर प्रयोजनार्थ होणा-या **रुपये एकशे पाच कोटी छत्तीस लाख अठ्याहत्तर हजार फक्त** (२०३.३६,७८,०००/-) इतक्या रकमेचा खर्च हा मागणी क्र. एफ-२, २२१७, नगर विकास, ८०-सर्वसाधारण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगरविकास प्राधिकरणे, नगर सुधार मंडळे, इत्यादींना सहाय्य, केंद्रसहायीत योजना, (००) (५७) महाराष्ट्र नगरोत्थान महाअभियानांतर्गत सहाय्यक अनुदान (२२१७८०२१), दत्तमत (योजनांतर्गत) ३१, सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या चालू आर्थिक वर्षी मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५६६/व्यय-३, दिनांक २१/१२/२०१० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( रा. वि. कुलकर्णी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति --

१) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१ , मुंबई
२) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)- २ , मुंबई
३) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५) प्रधान सचिव, वित्त / प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त व संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय तथा नोडल एजन्सी, मुंबई
७) आयुक्त, कोल्हापूर, सोलापूर, नांदेड-वाघाळा, कल्याण-डोंबिवली , भिवंडी-निजामपूर महानगरपालिका
८) मुख्याधिकारी, मनमाड, कामठी, नगर परिषद
९) रोखशाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) उप सचिव ( नवि-३३ ) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
११) कक्ष अधिकारी (नवि-४) नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (नवि-३३)